**रामेती, पुणे संस्थेच्या उपहारगृहातील शौचालय व वॉशिंग शेडचे बांधकाम करणेसाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१३६/३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २८ एप्रिल, २०२५

**वाचा :**

१. कृषि संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.कृआ.पुणे/नस्ती/आत्मा(वि.प्र.५)शाखा/प्र.क्र.१२/५२/२०२५,दि. २०.०३.२०२५
२. संचालक, वनामती यांचे पत्र क्र. वनामती/बांधकाम/निधी मागणी/६३१/२०२५, दि.१०.०३.२०२५
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्र.मुअपु/का-२/इमारती/७०६/२०२५, दि.५.२.२०२५
४. वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम(भाग-२), दि. २०.०९.२०१९
५. सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमारती-२, दि.२५.०९.२०१९

**प्रस्तावना :-**

राज्यातील कृषि विकास घटकाचे महत्व लक्षात घेऊन कृषि आणि कृषिशी निगडीत विषयाबाबत अद्यावत प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने नागपूर येथे वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, ही संस्था शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आली आणि राज्यातील नागपूर, पुणे, छत्रपती संभाजीनगर, अमरावती, नाशिक, कोल्हापूर व खोपोली येथील सात प्रशिक्षण संस्था या शिखर प्रशिक्षण संस्थेच्या सहकारी व संलग्न संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या आहेत. दिनांक १७ जुलै,२००१ च्या शासन निर्णयानुसार नागपूर येथील शिखर प्रशिक्षण संस्था आणि तिच्या विभागीय सात संलग्न संस्था स्वायत्त संस्था म्हणून घोषित करण्यात आल्या.

सन २०२४-२५ मध्ये वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ २६४९) या योजनेअंतर्गत रु.६००.०० लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे.

रामेती, पुणे संस्थेच्या उपहारगृहातील शौचालय व वॉशिंग शेडचे बांधकाम करणेसाठी रु.४८.१७ लक्ष निधीस प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती कृषि संचालक (आत्मा) यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये केली आहे. सदर कामासाठी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्याकडून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता घेण्यात आली आहे.

त्यानुषंगाने रामेती, पुणे संस्थेच्या उपहारगृहातील शौचालय व वॉशिंग शेडचे बांधकाम करणेसाठीच्या कामासाठी वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ २६४९) या योजनेअंतर्गत रु.४८.१७ लक्ष निधीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय :-**

१. रामेती, पुणे संस्थेच्या उपहारगृहातील शौचालय व वॉशिंग शेडचे बांधकाम करणेसाठीच्या कामासाठी वसंतराव नाईक राज्य कृषि व्यवस्थापन संस्थेची आस्थापना (कार्यक्रम) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२४०१ २६४९) या योजनेअंतर्गत रु.४८.१७ लक्ष (एकूण रूपये अठ्ठेचाळीस लक्ष सतरा हजार फक्त) निधीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत मान्यता वित्त विभाग, शासन निर्णय दि. २०.०९.२०१९ व सार्वजनिक बांधकाम शासन निर्णय दि.२५.०९.२०१९ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२८१७३२५४११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VISHAL DATTATRAY TEKE

Digitally signed by VISHAL DATTATRAY TEKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b1a35a7424e4c5b594d9cb1798ac47cf07d8f7d496693efc58a7720a5cdafc92, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8EB1C9B88DDF43C0CCD87A95BD631AD3EE730CDB839A8115F112376617EAE32F, cn=VISHAL DATTATRAY TEKE
Date: 2025.04.28 17:34:20 +05'30'

( विशाल टेके )
**कार्यासन अधिकरी , महाराष्ट्र शासन**

प्रति-

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
५. संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
९. सर्व विभागीय कृषी सह संचालक
१०. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१२. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई-३२
१३. नियोजन विभाग का.१४३१, मंत्रालय, मुंबई-३२
१४. निवड नस्ती ३-अे